**सैनिकी सेवेतून सेवानिवृत्त होऊन नागरी सेवेत पुनर्नियुक्त होणा-या कर्मचा-यांची सुधारित वेतनश्रेणीत वेतननिश्चिती करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**

शासन निर्णय क्रमांक : पुनिवे-१००९/ प्र.क्र.७८/सेवा-४ ,
मंत्रालय , मुंबई- ४०००३२ , दिनांक १६ ऑगस्ट, २०११

संदर्भः शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक : पुनिवे-१००९/ प्र.क्र.७८/सेवा-४ ,दिनांक.१५ डिसेंबर, २००९.

## शासन निर्णय

सैनिकी सेवेतून सेवानिवृत्त होऊन नागरी सेवेत पुनर्नियुक्त होणा-या कर्मचा-यांचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम १६२ नुसार निश्चित करण्यात येते. या नियमातील नियम १६२(बी) नुसार संबंधितांचे पुनर्नियुक्तीनंतरचे वेतन, निवृत्तीवेतनविषयक लाभ विचारात न घेता अखेरच्या मिळालेल्या वेतनाइतक्या समयश्रेणीतील टप्प्यावर निश्चित करावयाचे आहे. पाचव्या वेतन आयोगापर्यंत प्रत्येक पदासाठी स्वतंत्र वेतनश्रेणी विहीत करण्यात आली होती व समयश्रेणी ही संकल्पना होती. यामुळे उपरोक्त तरतुदीनुसार कार्यवाही करणे शक्य होते. मात्र सहाव्या वेतन आयोगात स्वतंत्र वेतनश्रेणीची/समयश्रेणीची संकल्पना नसून वेतन-बँड ठरविण्यात आलेला आहे. या वेतन-बँड मध्ये अनेक वेतनश्रेणी समायोजित झाल्यामुळे नियमातील तरतुदीनुसार वेतननिश्चिती समयश्रेणीतील टप्प्यावर करण्याची कार्यवाही करता येणार नाही. महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम २००९ च्या नियम २ (२) (ग) नुसार जे शासकीय कर्मचारी दिनांक ३१ डिसेंबर २००५ रोजी किंवा तत्पूर्वी सेवानिवृत्त झाले, आणि ज्यांना सेवानिवृत्तीनंतर त्या तारखेस पुन्हा नियुक्त करण्यात आले आणि ज्यांच्या सेवानिवृत्तीनंतरचा पुनर्नियुक्तीचा कालावधी त्या तारखेनंतर वाढवून दिलेला आहे अशांना महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम २००९ लागू नाहीत . अशा व्यक्तींना सुधारित वेतनश्रेणीचा लाभ देऊन त्यांचे सुधारित वेतनश्रेणीत वेतन निश्चित करण्याचे आदेश संदर्भाधिन दिनांक १५ डिसेंबर, २००९ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आले आहेत. तथापि सुधारित वेतनश्रेणीत वेतननिश्चिती करताना येत असलेल्या अडचणी निदर्शनास आल्या आहेत. या सर्व अडचणींचा विचार करुन प्रस्तुत प्रकरणी खालीलप्रमाणे कार्यवाही करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

१) जे कर्मचारी सैनिकी सेवेतून दि.१.१.२००६ पूर्वी सेवानिवृत्त होऊन दि.१.१.२००६ पूर्वीच (पाचव्या वेतन आयोगाच्या वेतनश्रेणीत) नागरी सेवेत पुनर्नियुक्त झाले आहेत व ज्यांची असुधारित वेतनश्रेणीत महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम १६२ (बी) नुसार वेतननिश्चिती करण्यात आली आहे अशा कर्मचा-यांची दि.१.१.२००६ पूर्वीची असुधारित वेतनश्रेणीतील वेतननिश्चिती व दि.१.१.२००६ रोजी सुधारित वेतनसंरचनेतील वेतननिश्चिती खाली नमूद केलेल्या उदाहरणानुसार करण्यात यावी.

**उदा. अ)** सैनिकी सेवा समाप्तीच्या दिनांकास रु.५७००/- एवढे मुळ वेतन घेणा-या माजी सैनिकाची रु.५५००-१७५-९००० या असुधारित वेतनश्रेणीतील पदावर (उदा. सहाय्यक) पुनर्नियुक्ती झाल्यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम १६२ (बी) नुसार त्याची वेतननिश्चिती रु.५६७५ + रु.२५ विशेष वेतन अशी होईल. संबंधित कर्मचा-याची दि.१.१.२००६ रोजी त्याला अनुज्ञेय असलेल्या सुधारित वेतनसंरचनेतील वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, २००९ मधील नियम ७ नुसार म्हणजे रु.५६७५ x १.८६ = रु.१०५६० (वेतनबँड मधील वेतन) इतकी होईल. तसेच त्याला संबंधित पदासाठी विहीत केलेले ग्रेड वेतन (उदा. सहाय्यक पदासाठी रु.४३००/- ) अनुज्ञेय राहील.

**उदा. ब)** सैनिकी सेवा समाप्तीच्या दिनांकास रु.४४००/- एवढे मुळ वेतन घेणा-या माजी सैनिकाची रु.२५५०-५५-३२०० या असुधारित वेतनश्रेणीतील पदावर (उदा. शिपाई) पुनर्नियुक्ती झाल्यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम १६२ (बी) नुसार त्याची वेतननिश्चिती रु.३२०० + रु.१२०० विशेष वेतन अशी होईल. संबंधित कर्मचा-याची दि.१.१.२००६ रोजी त्याला अनुज्ञेय असलेल्या सुधारित वेतनसंरचनेतील वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, २००९ मधील नियम ७ नुसार म्हणजे रु.३२०० x १.८६ = रु.५९६० (वेतनबँड मधील वेतन) इतकी होईल. तसेच त्याला संबंधित पदासाठी विहीत केलेले ग्रेड वेतन (उदा. शिपाई पदासाठी रु.१३००/- ) अनुज्ञेय राहील.

वरिलप्रमाणे वेतननिश्चिती केल्यानंतर संबंधित कर्मचा-यांच्या वेतनवाढी नियम १० नुसार विनियमित करण्यात याव्यात.

२) दि.१.१.२००६ पूर्वी सैनिकी सेवेतून सेवानिवृत्त होऊन जे माजी सैनिक दि.१.१.२००६ रोजी किंवा त्यानंतर नागरी सेवेत पुनर्नियुक्त झाले आहेत, अशा माजी सैनिकांची दि.१.१.२००६ रोजी सुधारित वेतनसंरचनेतील वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, २००९ मधील नियम ८ प्रमाणे या नियमांसोबतच्या जोडपत्र -३ नुसार खालीलप्रमाणे करण्यात यावी.

**उदा. अ)** एखाद्या माजी सैनिकाची दिनांक १.१.२००६ रोजी किंवा त्यानंतर वेतनबँड रु.९३००-३४८०० अधिक रु.४४०० ग्रेड वेतन या सुधारित वेतन संरचनेतील पदावर (उदा. कक्ष अधिकारी) पुनर्नियुक्ती झाल्यास महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन ) नियम, २००९ मधील नियम ८ प्रमाणे या नियमांसोबतच्या जोडपत्र -३ नुसार सुधारित वेतनसंरचनेत त्याची वेतननिश्चिती रु.१०९०० (वेतनबँड मधील वेतन) अधिक रु.४४०० ग्रेड वेतन अशी होईल.

**उदा. ब)** एखाद्या माजी सैनिकाची दिनांक १.१.२००६ रोजी किंवा त्यानंतर वेतनबँड रु.५२००-२०२०० अधिक रु.२४०० ग्रेड वेतन या सुधारित वेतन संरचनेतील पदावर (उदा.तारतंत्री ) पुनर्नियुक्ती झाल्यास महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन ) नियम, २००९ मधील नियम ८ प्रमाणे या नियमांसोबतच्या जोडपत्र -३ नुसार सुधारित वेतनसंरचनेत त्याची वेतननिश्चिती रु.७५१० (वेतनबँड मधील वेतन) अधिक रु.२४०० ग्रेड वेतन अशी होईल.

दि.२ जुलै ते दि.१ जानेवारी या कालावधीत नियुक्त झालेल्या कर्मचा-यास पुढील १ जुलै रोजी वेतनवाढ अनुज्ञेय राहील. तर दि.२ जानेवारी ते दि. ३० जून या कालावधीत नियुक्त झालेल्या कर्मचा-यास **पुढील वर्षाच्या** १ जुलै रोजी वेतनवाढ अनुज्ञेय राहील.

३) दि.१.१.२००६ रोजी किंवा त्यानंतर सैनिकी सेवेतून सेवानिवृत्त होऊन जे माजी सैनिक दि.१.१.२००६ रोजी किंवा त्यानंतर नागरी सेवेत पुनर्नियुक्त झाले आहेत, अशा माजी सैनिकांची दि.१.१.२००६ रोजी सुधारित वेतनसंरचनेतील वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, २००९ मधील नियम ८ प्रमाणे या नियमांसोबतच्या जोडपत्र -३ नुसार खालीलप्रमाणे करण्यात यावी.

**उदा. अ)** एखाद्या माजी सैनिकाची दिनांक १.१.२००६ रोजी किंवा त्यानंतर वेतनबँड रु.५२००-२०२०० अधिक रु.२८०० ग्रेड वेतन या सुधारित वेतन संरचनेतील पदावर (उदा. भांडारपाल) पुनर्नियुक्ती झाल्यास महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन ) नियम, २००९ मधील नियम ८ प्रमाणे या नियमांसोबतच्या जोडपत्र -३ नुसार सुधारित वेतनसंरचनेत त्याची वेतननिश्चिती रु.८५६० (वेतनबँड मधील वेतन) अधिक रु.२८०० ग्रेड वेतन अशी होईल.

**उदा. ब)** एखाद्या माजी सैनिकाची दिनांक १.१.२००६ रोजी किंवा त्यानंतर वेतनबँड रु.५२००-२०२०० अधिक रु.१९०० ग्रेड वेतन या सुधारित वेतन संरचनेतील पदावर (उदा. वाहनचालक ) नियुक्ती झाल्यास महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन ) नियम, २००९ मधील नियम ८ प्रमाणे या नियमांसोबतच्या जोडपत्र -३ नुसार सुधारित वेतनसंरचनेत त्याची वेतननिश्चिती रु.५८३० (वेतनबँड मधील वेतन) अधिक रु.१९०० ग्रेड वेतन अशी होईल.

दि.२ जुलै ते दि.१ जानेवारी या कालावधीत नियुक्त झालेल्या कर्मचा-यास पुढील १ जुलै रोजी वेतनवाढ अनुज्ञेय राहील. तर दि.२ जानेवारी ते दि. ३० जून या कालावधीत नियुक्त झालेल्या कर्मचा-यास **पुढील वर्षाच्या** १ जुलै रोजी वेतनवाढ अनुज्ञेय राहील.

४ ) उपरोक्त सर्व प्रकरणात जेथे निवृत्तीवेतन दुर्लक्षित करावयाचे आहे अशा सर्व प्रकरणात निवृत्तिवेतन हे स्वतंत्रपणे घेण्यात येईल. मात्र राजादिष्ट अधिकारी व नागरी अधिकारी यांच्या प्रकरणी रु.१०००/- एवढेच निवृत्तीवेतन दुर्लक्षित करावयाचे आहे.

५) सैनिकी विभागात गट-अ पदावर कार्यरत असलेल्या व वयाची ५५ वर्षे पूर्ण होण्यापूर्वी दिनांक १.१.२००६ पूर्वी सेवानिवृत्त झालेल्या ज्या राजादिष्ट अधिका-यांची दुर्लक्षित सेवानिवृत्ती रकमेची मर्यादा रु.१०००/- एवढी आहे, अशा दिनांक १/१/२००६ रोजी किंवा त्यानंतर पुनर्नियुक्तीने नियुक्त झालेल्या अधिका-यांची पुनर्नियुक्तीनंतरची सुधारित वेतनसंरचनेतील वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन ) नियम, २००९ मधील नियम ८ प्रमाणे या नियमांसोबतच्या जोडपत्र -३ नुसार करण्यात यावी. संबंधित अधिका-याला पुनर्नियुक्त पदाचे ग्रेड वेतन मंजूर करण्यात यावे. अशा प्रकारे वेतन निश्चिती केल्यानंतर त्यातून निवृत्तीवेतनाचा दुर्लक्षित न केलेला भाग कमी करण्यात यावा.

६) सैनिकी सेवेतून निवृत्त होऊन नागरी सेवेत पुनर्नियुक्त झालेल्या कर्मचा-यांना पुनर्नियुक्तीवरील वेतनावरही महागाई भत्ता अनुज्ञेय राहील.

७) राज्याच्या सेवेत पुनर्नियुक्त झालेल्या माजी सैनिकांची नागरी सेवेतील वेतननिश्चिती करताना मिलीटरी पे, एक्स ग्रुप पे, कॉलीफिकेशन पे व गुड कंडक्ट पे विचारात घेण्यात येऊ नयेत.

२. वेतन निश्चिती संदर्भात म.ना.से.(नि.वे.) नियम १९८२ मधील नियम १६२ (बी) मधील तरतुदी या शासन निर्णयातील तरतुदींच्या मर्यादेपर्यंत सुधारण्यात आल्या आहेत असे समजण्यात यावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या वेब साईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक **२०११०८२०१३०६६३८००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**र.आ.नागरगोजे**
शासनाचे अवर सचिव .

प्रति,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई (१००० प्रती),
महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई (५ प्रती),
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई (५ प्रती),
अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई (२५ प्रती),
संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई,(१० प्रती)
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई (१० प्रती),
उप-मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती (प्रत्येकी १०प्रती),
वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक (प्रत्येकी १५ प्रती),
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (प्रत्येकी १० प्रती),
सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर (१००० प्रती)
महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर (५प्रती),
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
सर्व विभागीय आयुक्त (प्रत्येकी ५ प्रती),
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती),
तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रती),
सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती), संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई (५ प्रती),
सर्व विभागीय शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),
सर्व विभागीय तंत्र शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),
शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई, दक्षिण/उत्तर/पश्चिम,
सर्व प्रशासन अधिकारी, नगरपालिका शिक्षण मंडळ (प्रत्येकी ५ प्रती),
सर्व महानगरपालिका व नगरपरिषदा, महाराष्ट्र राज्य (प्रत्येकी ५ प्रती),
सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती),

*विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
*प्रबंधक,, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा) मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा),मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
*प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई/नागपूर/औरंगाबाद
मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र, मुंबई.
आयुक्त, राज्य माहिती आयोग (सर्व)
सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, १ला मजला, मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
ग्रं थपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई - ४०० ०३२. (१० प्रती)च
कार्याध्यक्ष, महाराष्ट्र पेन्शनर्स असोसिएशन, १४४९, सदाशिव पेठ, 'संकल्प' खजिना महाल बोळ, एस.पी.कॉलेज समोर, पुणे ४११ ०३०
ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती),
शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती),
उच्च व तंत्र शिक्षण आणि सेवायोजन विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती),
कृषि व पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती),
मंत्रालयातील सर्व विभाग,
कुल सचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर (१० प्रती),
कुल सचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ , परभणी (१० प्रती),
कुल सचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला (१० प्रती),
कुल सचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी (१० प्रती),
कुल सचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर (१० प्रती),
कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ, लोणेर, जिल्हा रायगड (१० प्रती),
बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई १ (५ प्रती)
भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक नं. १,योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक,नरिमन पॉईंट , मुंबई २० (५ प्रती)
भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड,, मुंबई ४ ( ५ प्रती)
भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी , मुंबई १३ ( ५ प्रती )
इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई २५ (५ प्रती )
नॅशनलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई २१ ( ५ प्रती )
शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २८ (५ प्रती)
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.

---

***पत्राद्वारे.**